सन २०२१-२२ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. ५५.८० कोटी निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो-२०२२/प्र.क्र.२०(भाग-१)/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२.

दिनांक : १५ मार्च , २०२२.

**संदर्भ:**

१. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P) दि. १० जानेवारी, २०२२

२. आयुक्त (कृषि) यांचे पत्र क्र. कृआ/गुनि-५/नक्र १४७/२०२१-२२/१५२०/२०२२ दि. १४ जानेवारी, २०२२

३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. कृयांयो-२०२२/प्र.क्र.२०(भाग-१)/१४-अे दि. १७ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना :**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्रांची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १०० टक्के आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधी हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

वित्त विभागाच्या संदर्भांकीत दि.१४.१०.२०२१ च्या परिपत्रकान्वये कार्यक्रम खर्चासाठी अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ५० टक्के निधी वितरणाचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान केले होते त्यानुसर सर्वसाधारण प्रवर्गासाठी उपलब्ध तरतूदीच्या ५०% म्हणजेच रु. ५० कोटी निधी (केंद्र हिस्सा रु. ३० कोटी + राज्य हिस्सा रु. २० कोटी) दि. १७ जानेवारी, २०२२ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरित करण्यात आला असून केंद्र हिश्श्याचा रु. ३३४८.१६ लक्ष व राज्य हिश्श्याचा रु. २२३२.१० लक्ष असा एकूण रु. ५५८०.२६ लक्ष निधी वितरीत करणे बाकी होते.

केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियानांतर्गत सन २०२१-२२ करिता प्राप्त सर्वसाधारण प्रवर्गाचा उर्वरित रु. ५५८०.२६ लक्ष निधी (केंद्र हिस्सा रु. ३३४८.१६ लक्ष व राज्य हिस्सा रु. २२३२.१० लक्ष) वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२१-२२ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप-अभियानाच्या अंमलबजावणीकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.५५८०.२६ लक्ष निधी (रुपये पंचावन्न कोटी ऐंशी लाख सव्वीस हजार फक्त) आयुक्त, कृषि यांना वितरित करण्यात येत आहे. या निधीमध्ये केंद्र हिश्श्याचा रु. ३३४८.१६ लक्ष (रुपये तेहत्तीस कोटी अठ्ठेचाळीस लाख सोळा हजार फक्त) व राज्य हिश्श्याचा रु. २२३२.१० लक्ष (रुपये बावीस कोटी बत्तीस लाख दहा हजार फक्त) निधीचा समावेश आहे.

२. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु. ५५८०.२६ लक्ष निधी खालील लेखाशिर्षाखाली चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीमधून खर्ची टाकावा.

| **केंद्र** | **राज्य** |
|---|---|
| मागणी क्रमांक:- डी-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)११३-कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०८) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१ २५१३)<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक:- डी-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)११३-कृषि अभियांत्रिकी<br>(००)(१६) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो),<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ ८७३६)<br>३३ अर्थसहाय्य |

३. या उप-अभियानाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने वार्षिक कृति आराखड्यात मंजूर केलेल्या बाबींवर खर्ची टाकावा. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजुरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

४. सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती/जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लक्ष यापैकी जे कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी ४०% किंवा रु.१ लक्ष यापैकी जे कमी असेल ते याप्रमाणे अनुदान देण्यात यावे.

५. इतर यंत्र/अवजारांच्या बाबतीत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तींचे व संदर्भाधीन शासन निर्णय दि. १७ जानेवारी, २०२२ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. सदर अभियानाकरिता वितरित केलेला निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून आणि सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २६/ २२/ व्यय-१, दि. ०८ मार्च २०२२ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१५१८२९१७८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.03.15 18:33:27 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई,
३. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. संचालक/सह संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे-१,
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व),
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व),
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता),
११. नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई,
१२. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)